सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात तालुका क्रीडा संकुलांना अनुदान वितरीत करणेबाबत- लेखाशिर्ष (२२०४-१७९२)

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ताक्रीसं-१४२३/प्र.क्र.२२/क्रीयुसे-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/ क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) राज्य क्रीडा विकास समितीच्या दिनांक २३ मार्च, २०२२ व दिनांक १९.१०.२०२२ रोजीच्या बैठकांचे इतिवृत्त.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.राक्रीधो-२०१९/प्र.क्र.९२/क्रीयुसे-१, दिनांक २३ मार्च, २०२२.
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र:क्रीविसं-१७२२/प्र.क्र.४१/क्रीयुसे-१, दिनांक २९ मार्च, २०२२.
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.ताक्रीसं-१४२२/प्र.क्र.४३/क्रीयुसे-१, दिनांक ३१ मार्च, २०२२.
७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.ताक्रीसं-१४२२/प्र.क्र.६४/क्रीयुसे-१, दिनांक ०९ जून, २०२२.
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.ताक्रीसं-१४२२/प्र.क्र.६४/क्रीयुसे-१, दिनांक १३ डिसेंबर, २०२२.
१०) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.ताक्रीसं/ निमा/निवि/ २२-२३/का-९/७९४४, दिनांक १० फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

राज्य क्रीडा धोरणांतर्गत विभागीय/जिल्हा/तालुका स्तरावर क्रीडा संकुले उभारण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये अनुदान योजना कार्यान्वित केली आहे. या योजनेंसाठी संदर्भ क्र.२ येथील दि.२१ मार्च, २००९ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अनुदान मर्यादेत संदर्भ क्र.४ येथील दिनांक २३ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली असून, क्रीडा संकुलांच्या अनुदान मर्यादेत पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आलेली आहे:-

(१) अद्याप प्रशासकीय मान्यता न दिलेल्या अथवा प्रशासकीय मान्यता दिलेली आहे परंतु, अद्याप प्रत्यक्ष बांधकाम सुरु झालेले नाही, अशा क्रीडा संकुलांच्या बाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे विहित करण्यात आली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा (रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ५००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.२५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.५०००.०० लक्ष |

(२) क्रीडा संकुलांच्या अंदाजपत्रकांना/सुधारीत अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता दिलेली आहे व बांधकाम पूर्ण झाले आहे अथवा प्रगतीपथावर असलेल्या/अपूर्ण असलेल्या क्रीडा संकुलांच्या बाबत अनुदान मर्यादा पुढीलप्रमाणे विहित करण्यात आलेली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा (रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ३००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.१५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.३०००.०० लक्ष |

दिनांक २३ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ट-अ, परिशिष्ट-ब व परिशिष्ट-क मध्ये विहित केल्यानुसार विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलासाठी क्रीडा सुविधांविषयक टाईप प्लॅन्स विहित केले असून, परिशिष्ट-ड मध्ये त्यासंदर्भातील सर्वसाधारण अटी/शर्ती विहित केलेल्या आहेत.

सन २०२२-२३ या चालू आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२०४-१७९२ अंतर्गत, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील तरतूदीमधून, शासन निर्णय, दिनांक ०९.०६.२०२२ व दिनांक १३.१२.२०२२ अन्वये ३० तालुका क्रीडा संकुलांना रु.२३०५.८९३ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.०४.०४.२०२२ मधील निर्देशांनुसार सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून ६० टक्केच्या मर्यादेत मासिक विवरणपत्रानुसार उपलब्ध होणाऱ्या निधीतून तालुका क्रीडा संकुलांना टप्प्याटप्प्याने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मागणी क्र.ई-३, (१०)(०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-१७९२ या लेखाशिर्षाखाली रु.६५००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ०४.०४.२०२२ अन्वये अर्थसंकल्पीत तरतूदीच्या ६० टक्के म्हणजे रु.३९००.०० लक्ष इतका निधी माहे, एप्रिल ते डिसेंबर, २०२२ या नऊ महिन्यांच्या खर्चासाठी मासिक विवरणपत्रानुसार वितरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार सन २०२२-२३ साठी अर्थसंकल्पीत तरतूदीमधून प्रथम टप्प्यात शासन निर्णय, दिनांक ०९.०६.२०२२ अन्वये नऊ तालुका क्रीडा संकुलांना रु.८६६.६५ लक्ष, शासन निर्णय, दिनांक २५.११.२०२२ अन्वये तालुका क्रीडा संकुल, बल्लारपूर या संकुलास रु.२८९.२४३ लक्ष तसेच, दिनांक १३.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये २० तालुका क्रीडा संकुलांना रु.११५०.०० लक्ष असे एकूण ३० तालुका क्रीडा संकुलांना एकूण रु.२३०५.८९३ लक्ष इतका निधी वितरीत केलेला आहे.

२. क्रीडा संचालनालयाने संदर्भ क्र.१० येथील दिनांक १०.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सन २०२२-२३ साठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून तालुका क्रीडा संकुलांना निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्याअनुषंगाने मागणी क्र.ई-३, (१०)(०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-१७९२ या लेखाशिर्षाखालील रु.६५००.०० लक्ष अर्थसंकल्पीय तरतूदीमधून, सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील १७ तालुका क्रीडा संकुलांना निधी उपलब्धतेनुसार त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार एकूण रु.९००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर निधी खालील अटी/शर्तीच्या अधिन राहून बांधकामाच्या प्रगतीनुसार वितरीत करण्यात यावा.

I. संबंधित तालुका क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे व सुधारीत अंदाजपत्रकास आवश्यकतेनुसार विहित प्राधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

II. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याचवेळी आहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेरील बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

III. राज्य शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेली वित्तविषयक विविध परिपत्रके/ आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय नियमावली यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन, वितरीत निधीचा विनियोग करण्यात यावा.

IV. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत सादर करावे.

३. उपरोक्त बाबीवरील खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)," संगणक क्रमांक (२२०४ १७९२), या लेखाशीर्षाखाली आर्थिक वर्ष २०२२-२३ करीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ०४.०४.२०२२ व अप्पर मुख्य सचिव (वित्त) यांचे अ.शा.प.क्र.दिनांक ०५.०४.२०२२ मधील अटी/शर्तीच्या अधिन राहून निधी खर्च करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नावे नमूद केलेल्या तालुका क्रीडा संकुलांना त्यांच्या नावासमोरील दर्शविण्यात आलेली मंजूर रक्कम कोषागारातून आहरित करण्याकरिता संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०.१३/प्र.क्र.३०/२०१३/विवियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व त्या-त्या विभागांना वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२३०२२४१६२३३९०८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: CN = RANSING ANANDRAO DERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2023.02.24 16:27:15 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) , मुंबई.
६. मा.राज्य मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०.संबंधित जिल्हाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
११.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१२.महालेखापाल (लेखा परिक्षा), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१३.संबंधीत उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४.संबंधित अधिदान व लेखाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५.संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, (क्रीडा संचालनामार्फत)
१६.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१७.संबंधित वरिष्ठ कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१८.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१९.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवड नस्ती (क्रीयुसे-१).

(शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.ताक्रीसं-१४२३/प्र.क्र.२२/क्रीयुसे-१, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२३ सोबत जोडलेले परिशिष्ट)

तालुका क्रीडा संकुलांची यादी-

**परिशिष्ट- अ**

| अ.क्र. | तालुका क्रीडा संकुल | मान्यता दिलेली अंदाजपत्रकीय रक्कम | शासन देय अनुदान मर्यादा | यापूर्वी वितरीत निधी | वितरणासाठी मंजूर रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ७ |
| १ | हिंगोली, जि. हिगोली | ३९९.९९ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| २ | ठाणे, जि. ठाणे | १३८६.१३ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ३ | फुलंब्री, जि. औरंगाबाद | ५५३.८९ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ४ | धानोरा, जि. गडचिरोली | ५०१.६९ | ५००.०० | ०.०० | ५०.०० |
| ५ | चोपडा,जि.जळगाव | ५२६.१० | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ६ | जामनेर, जि. जळगांव | ३९५३.४९ | ५००.०० | ०.०० | १००.०० |
| ७ | चिमूर, जि. चंद्रपूर | ६२०.९७ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ८ | कुही, जि. नागपूर | ५३७.६८ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ९ | मंठा, जि. जालना | १६३० | ४००.०० | २५०.०० | ५०.०० |
| १० | राहाता,जि. अहमदगनर | ४१८.९७ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| ११ | जिंतुर, जि. परभणी | ४०० | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| १२ | कुलाबा,अे-बार्ड जि.मुंबई शहर | ७२९.७० | ५००.०० | ०.०० | ५०.०० |
| १३ | औंढा-नागनाथ, जि.हिंगोली | ३९९.९४ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| १४ | बुलढाणा ,जि.बुलढाणा | ५१०.९७ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| १५ | दोडामार्ग, जि. सिंधुदुर्ग | १३८.९१ | १३८.९१ | ३५.१४ | ५०.०० |
| १६ | पारोळा, जि. जळगांव | ५९४.९४ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| १७ | धरणगांव, जि. जळगांव | ५९४.७७ | ४००.०० | १००.०० | ५०.०० |
| | एकूण- रु. | | | | ९००.०० |

(अक्षरी रुपये नऊ कोटी फक्त)

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: CN = RANSING ANANDRAO DERE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT
Date: 2023.02.24 16:27:42 +05'30'

**( रणसिंग डेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**